मा. दिवाणी न्यायालय, वरिष्ठ स्तर, परभणी यांच्या दि. १९.०७.२०१६ च्या आदेशानुसार श्रीमती सागराबाई साहेबराव डोंबे यांच्यावरील कुटुंब नियोजनाची शस्त्रक्रिया असफल झाल्याने तक्रारदार संगीता साहेबराव डोंबे यांना दयावयाच्या नुकसान भरपाईबाबत.

# महाराष्ट्र शासन
## सार्वजनिक आरोग्य विभाग
## शासन निर्णय क्रमांकः कुनिश-२०१७/१४८९/प्र.क्र.६३६/कु.क.

१० वा मजला, बी विंग, गो.ते.रुग्णालय संकुल इमारत
नवीन मंत्रालय, लो.टि.मार्ग, मुंबई ४०० ००१
तारीख: २९ ऑगस्ट, २०१८

**वाचा -**

१) मा. दिवाणी न्यायालय, वरिष्ठस्तर, परभणी यांचे नियमित सिव्हील सुट क्रमांकः ९६/२०१५ (नवीन) च्या संदर्भात, दि. १९.०७.२०१६ चे आदेश.
२) अतिरिक्त संचालक, आरोग्य सेवा राज्य कुटुंब कल्याण कार्यालय, पुणे यांचे क्रमांकः राकुकका/ दक्षता/कक्ष-८ (ब)/श्रीमती डोंबे/न्या.प्रकरण/न.क्र.१४१/२७८४३-४८/१८, दि.०४.०५.२०१८ चे पत्र.

**प्रस्तावना -**

श्रीमती. सागराबाई साहेबराव डोंबे यांच्यावरील कुटुंब नियोजनाची शस्त्रक्रिया असफल होवून त्यांनी एका मुलीला जन्म दिला असल्याने तिच्या पालनपोषणासाठी संगीता साहेबराव डोंबे व सागराबाई साहेबराव डोंबे यांनी नुकसानभरपाई पोटी रक्कम रुपये ३ लाख मिळण्याबाबत मा. दिवाणी न्यायालय, वरिष्ठ स्तर, परभणी येथे स्पेशल सुट क्र. ९९/२००४ (जुना) नियमित सिव्हील सुट क्रं. ९६/२०१५ (नवीन) दि.१५.१२.२००४ रोजी दाखल केला होता. सदर दाव्याचा अंतिम निकाल हा दिनांक १९.०७.२०१६ रोजी लागला असून न्यायालयाने संगीता साहेबराव डोंबे यांना रु. १,००,०००/- व त्यावरील ६ टक्के प्रमाणे व्याजासह एकुण रु. १,७५,०००/- देण्याचे आदेश दिले आहेत. त्यास अनुसरुन संदर्भ क्र. २ अन्वये अतिरिक्त संचालक, आरोग्य सेवा, राज्य कुटुंब कल्याण कार्यालय, पुणे यांनी शासनास प्रस्ताव सादर केला आहे. याबाबत शासन पुढील प्रमाणे मंजुरी देत आहेत.

**शासन निर्णय-**

नियमित सिव्हील सुट क्रमांकः ९६/२०१५ (नवीन) च्या संदर्भात, मा. दिवाणी न्यायालय वरिष्ठ स्तर, परभणी यांच्या दि. १९.०७.२०१६ च्या आदेशाच्या अनुषंगाने श्रीमती सागराबाई साहेबराव डोंबे यांच्यावरील कुटुंब नियोजनाची शस्त्रक्रिया असफल झाल्याने त्यांची मुलगी संगीता साहेबराव डोंबे यांना रु. १, ७५,०००/- एवढी रक्कम देण्यासाठी या शासन निर्णयान्वये मंजुरी देण्यात येत आहे. प्रस्तुत प्रकरणी अतिरिक्त संचालक, आरोग्य सेवा, राज्य कुटुंब कल्याण कार्यालय, पुणे हे आहरण व संवितरण अधिकारी म्हणून काम पहातील.

यासाठी होणारा खर्च मागणी क्र. आर - १, २२११ कुटुंब कल्याण, १०५ नुकसान भरपाई (०१) नुकसान भरपाई पंचवार्षिक योजनांतर्गत योजना - राज्य योजनांतर्गत योजना (०१) (०२) पुरुष नसबंदी शस्त्रक्रियेसाठी प्रोत्साहनात्मक रक्कम (२२११ ०५९७) ३१, सहाय्यक अनुदाने (वेतनेत्तर) या लेखाशीर्षाखाली उपलब्ध असलेल्या मंजूर तरतुदीतून भागविण्यात यावा.

सदरचा आर्थिक लाभ थेट लाभार्थीच्या आधारलिंक बॅक खात्यात जमा करण्यात येईल याची दक्षता आहरण व संवितरण अधिकारी यांनी घ्यावी व सदर प्रकरणी तात्काळ कार्यवाही करुन केलेल्या कार्यवाहीचा अनुपालन अहवाल शासनास सादर करुन त्याची एक प्रत मा. दिवाणी न्यायालय, वरिष्ठ स्तर, परभणी यांना सादर करावी.

हा शासन निर्णय वित्तीय नियम अधिकार पुस्तिका, १९७८ भाग पहिला, उपविभाग-२, अ.क्र.२, नियम क्रमांक ७ अन्वये प्रशासकिय विभागास प्रदान करण्यात आलेल्या अधिकारांचा वापर करुन निर्गमित करण्यात येत आहे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१८०८२९१५२९०९४६१७ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Ujwala Arun Ransing

Digitally signed by Ujwala Arun Ransing
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Public Health Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=a7788b3b31e2d9269bcbfd9588a6ee4771341780133d295a56dd4ef476977773, serialNumber=3b8f98f1c182bf458a4deee399a7241b5044aeb09c097bc6d28b58709fe8ef0d, cn=Ujwala Arun Ransing
Date: 2018.08.29 17:27:05 +05'30'

**(उज्वला अ. रणसिंग)**
अवर सचिव, महाराष्ट्र शासन

प्रत,

१. आयुक्त आरोग्य सेवा, तथा अभियान संचालक, राष्ट्रीय आरोग्य अभियान, मुंबई.
२. संचालक, आरोग्य सेवा संचालनालय, मुंबई.

३. अतिरिक्त संचालक, आरोग्य सेवा, राज्य कुटुंब कल्याण कार्यालय, पुणे.
४. सहाय्यक अधिक्षक, दिवाणी न्यायालय, वरिष्ठ स्तर, परभणी.
५. जिल्हा शल्य चिकित्सक, जिल्हा रुग्णालय, परभणी.
६. जिल्हा आरोग्य अधिकारी, जिल्हा परिषद, परभणी.
७. अवर सचिव (अर्थसंकल्प) सार्वजनिक आरोग्य विभाग, मंत्रालय, मुंबई.
८. संगीता साहेबराव डोंबे,रा.करवली,ता.जिंतुर,जि.परभणी.
९. निवडनस्ती.